आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ करीता संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत...
(लेखाशिर्ष २२३५ सी १६१)
(लेखाशिर्ष २२३५ सी १७२)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१ / प्र.क्र. ६ / कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :-१० डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

१) वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.६/कार्या-२१, दि.२२.४.२०२१, दि.०१.११.२०२१.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाची नस्ती क्र. विसयो-२०२१/प्र.क्र.४२/विसयो.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी संजय गांधी निराधार अनुदान योजनेसाठी रु.४०००.०० लाख व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेसाठी रु.८४००.०० लाख असा एकूण रु.१२४००.०० लाख इतका उर्वरीत निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण मधील संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना या योजनांकरीता संदर्भाधीन क्र. ३ येथील नस्तीवरील वित्त विभागाच्या मान्यतेस अनुसरुन सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून पुढीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २२-२०२१ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | यापूर्वी वितरीत तरतूद | या शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| संजय गांधी निराधार अनुदान योजना | २२३५ सी १६१ | ५०, इतर खर्च | १००००.०० | ६०००.०० | ४०००.०० |
| श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना | २२३५ सी १७२ | | २१०००.०० | १२६००.०० | ८४००.०० |
| | | **एकूण** | **३१०००.००** | **१८६००.००** | **१२४००.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१२४००.०० लाख (अक्षरी रुपये एकशे चोवीस कोटी फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१०७४/व्यय-१४, दि.२९.११.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२४१५३९४०४८२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2021.12.10 12:00:46 +05'30'

**(किरण कि.पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे
८. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र.१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.